“सार्वजनिक खरेदी आदेश-२०१७” (मेक इन इंडिया प्राधान्य) नुसार राज्याच्या दि.०१.१२.२०१६ रोजीच्या सुधारीत खरेदी धोरणात सुधारणा करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-खादीग्रा-२०२१/प्र.क्र.३१/उद्योग-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०७ मार्च, २०२४.

**संदर्भ :-** १) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६.
२) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्रमांक: संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दिनांक २४ ऑगस्ट, २०१७.
३) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्रमांक: भांखस-२०२०/प्र.क्र.९२/उद्योग-४, दिनांक २३ जुलै, २०२१.

**प्रस्तावना :-**

उद्योग विभागाच्या संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारित नियमपुस्तिका निर्गमित करण्यात आली असुन सदर नियमपुस्तिकेतील तरतुदीनुसार राज्य शासनाच्या सर्व विभागांना व त्यांच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रीय कार्यालयांना खरेदी प्रक्रिया राबविणे बंधनकारक करण्यात आले आहे. तसेच संदर्भ क्र.२ रोजीच्या शासन निर्णयान्वये केंद्र शासनाने विकसित केलेल्या गर्व्हमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलची कार्यपद्धती राज्य शासनाने वस्तू व सेवा खरेदीसाठी स्विकृत केली असून सुधारित नियमपुस्तिकेतील परिच्छेद २.४ मध्ये नमूद असलेल्या लक्षांकित विभाग/कार्यालयांना गर्व्हमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवरून खरेदी करणे बंधनकारक केले आहे.

केंद्र शासनाने “मेक इन इंडिया” या महत्त्वाकांक्षी कार्यक्रमांतर्गत, देशांतर्गत उत्पादित वस्तूंना तसेच स्थानिक उत्पादकांना चालना देण्याच्या दृष्टीकोणातून केंद्र शासनाच्या खरेदी धोरणात प्राधान्य देण्याबाबत निर्णय घेतला आहे. केंद्र शासनाच्या “मेक इन इंडिया” या महत्वाकांशी कार्यक्रमाच्या अनुषंगाने राष्ट्रीय खरेदी धोरणाशी सुसंगत असे राज्याचे खरेदी धोरण असावे व केंद्र शासनाने राष्ट्रीय खरेदी धोरणात ज्या सुधारणा केलेल्या आहेत त्या राज्य शासनाच्या खरेदी धोरणामध्ये अंतर्भुत करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने दिनांक ०१.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.२.८ अन्वये सुधारित खरेदी धोरणाच्या नियमपुस्तिकेतील तरतुदींचे पुनर्विलोकन करण्यासाठी मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत “पुनर्विलोकन उच्चाधिकार समिती” पुढे सदर प्रस्ताव सादर करण्यात आला होता. दिनांक २५.०८.२०२३ रोजीच्या बैठकीत “पुनर्विलोकन उच्चाधिकार समितीने” केंद्र शासनाच्या “सार्वजनिक खरेदी आदेश-२०१७” (मेक इन इंडिया प्राधान्य) नुसार राज्याच्या दि.०१.१२.२०१६ रोजीच्या सुधारीत खरेदी धोरणामध्ये सुधारणा करणेबाबतच्या सदर प्रस्तावास मान्यता दिलेली आहे.

त्यानुषंगाने केंद्र शासनाच्या “सार्वजनिक खरेदी आदेश-२०१७” (मेक इन इंडिया प्राधान्य) अनुसरून केंद्र शासनाने राष्ट्रीय खरेदी धोरणात ज्या सुधारणा केलेल्या आहेत त्या सुधारणा राज्य शासनाच्या दि.०१.१२.२०१६ रोजीच्या सुधारित खरेदी धोरणात समाविष्ट करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने “मेक इन इंडिया” या महत्त्वाकांक्षी कार्यक्रमांतर्गत, देशांतर्गत उत्पादित वस्तूंना तसेच स्थानिक उत्पादकांना चालना देण्याच्या दृष्टीकोणातून केंद्र शासनाच्या खरेदी धोरणात प्राधान्य देण्याबाबत

निर्णय घेतला आहे. केंद्र शासनाच्या “मेक इन इंडिया” या महत्वकांशी कार्यक्रमाच्या अनुषंगाने राष्ट्रीय खरेदी धोरणाशी सुसंगत असे राज्याचे खरेदी धोरण असावे व केंद्र शासनाने राष्ट्रीय खरेदी धोरणात ज्या सुधारणा केलेल्या आहेत त्या सुधारणा राज्य शासनाच्या दि. ०१.१२.२०१६ रोजीच्या प्रचलित खरेदी धोरणात करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुषंगाने सुधारित खरेदी धोरणात खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत.

१) **दिनांक ०१.१२.२०१६ रोजीच्या सुधारित खरेदी धोरणातील प्रकरण क्रमांक १ मधील व्याख्या आणि अर्थनिश्चिती यामध्ये नव्याने स्थानिक किमान सामग्री (**Minimum Local Content**) चा क्र.झेडझेड** (ZZ) **समावेश -**

<u>**स्थानिक किमान सामग्री (Minimum Local Content) (ZZ) :-**</u>

स्थानिक किमान सामग्री म्हणजे भारतामध्ये उत्पादन मुल्यवर्धीत (Value Addition) केल्याचे प्रमाण, संबंधित विभाग असे निर्धारित करीत नाहीत, तोपर्यंत खरेदी वस्तूंची एकूण किंमत निव्वळ अप्रत्यक्ष कर वगळून, वजा वस्तूंतील आयात केलेल्या सामग्रीचे मुल्य (सीमाशुल्क कराच्या समावेशासह) जे एकूण मुल्याच्या टक्केवारीच्या प्रमाणात असेल. स्थानिक किमान सामग्री यासाठी पुरवठादार खालीलप्रमाणे निर्धारीत असतील.

**अ)** <u>**वर्ग-१ स्थानिक पुरवठादार:-**</u>

ज्या पुरवठारामार्फत पुरवठा करण्यात येणाऱ्या वस्तू व सेवा यांतील स्थानिक सामग्रीचे प्रमाण किमान **५०%** असेल, असे पुरवठादार.

**आ)** <u>**वर्ग-२ स्थानिक पुरवठादार:-**</u>

ज्या पुरवठारामार्फत पुरवठा करण्यात येणाऱ्या वस्तू व सेवा यांतील स्थानिक सामग्रीचे प्रमाण किमान **२०%** असेल, असे पुरवठादार.

**इ)** <u>**बिगर स्थानिक पुरवठादार:-**</u>

ज्या पुरवठारामार्फत पुरवठा करण्यात येणाऱ्या वस्तू व सेवा यांतील स्थानिक सामग्रीचे प्रमाण वर्ग-२ स्थानिक पुरवठादारांपेक्षा कमी असेल असे पुरवठादार.

२) **दिनांक ०१.१२.२०१६ रोजीच्या सुधारित खरेदी धोरणातील परिच्छेद क्र.४.४.१.३ -**

खरेदीची निविदा प्रसिध्द करताना किंवा इतर खरेदी प्रक्रियेच्या अगोदरच संबंधित खरेदीच्या अनुषंगाने किमान स्थानिक सामग्री (Minimum Local Content), खरेदी प्राधान्य मर्यादा (Margin of Purchase preference) आणि “मेक इन इंडिया” करिता प्राधान्य देण्याची पध्दती नमुद करणे आवश्यक राहील. त्यामध्ये खरेदी प्रक्रिया सुरु झाल्यानंतर कोणताही बदल करता येणार नाही.

३) **दिनांक ०१.१२.२०१६ रोजीच्या सुधारित खरेदी धोरणामध्ये क्र.५.१८ हा परिच्छेद नव्याने स्थानिक सामग्री पडताळणी कार्यपध्दतीच्या तरतूदींचा समोवश-**

अ) वर्ग-१ व वर्ग-२ स्थानिक पुरवठादाराने निविदा, लिलाव किंवा देकारामध्ये, स्थानिक सामग्रीतील (Local Content) प्रमाणाची टक्केवारी दर्शविणे आवश्यक असेल आणि प्रकरणपरत्वे वर्ग-१ व वर्ग-२ स्थानिक पुरवठादार यांनी स्थानिक सामग्रीची पुर्तता करीत असल्याचे स्वयंघोषित प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. तसेच त्यांनी स्थानिक सामग्रीचे मूल्यवर्धन ज्या उत्पादन स्तरावर केले आहे त्याचा तपशील देणे आवश्यक राहील.

**ब)** रु.१० कोटी पेक्षा जास्त किंमतीची खरेदी करताना, वर्ग-१ किंवा वर्ग-२ स्थानिक पुरवठादाराने, वैधानिक लेखापरीक्षक (Statutory Auditor) /कंपनीचा खर्च लेखापरीक्षक (Cost Auditor) (कंपनींच्या बाबतीत) किंवा (Cost Accountant) लेखापाल / सनदी लेखापाल (Chartered

Accountant) (कंपन्यांव्यतिरिक्त इतर पुरवठादारांच्या बाबतीत) यांचे स्थानिक सामुग्री टक्केवारीचे प्रमाण दर्शविल्याबाबतचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.

**क)** सदर तरतूदीच्या अंमलबजावणीबाबतच्या तक्रारीसंदर्भात निर्णय घेण्याचे अधिकार खरेदीदार कार्यालयातील तक्रारी हाताळण्याचे अधिकार असलेल्या सक्षम प्राधिका-यांस राहील.

**ड)** पुरवठादाराने सादर केलेले “स्वयंघोषित प्रमाणपत्र” आणि लेखापरीक्षक / लेखापाल यांचे प्रमाणपत्रांची रँडम व तक्रारींची पडताळणी करण्यासाठी उद्योग विभागातंर्गत बाह्य तज्ञ व्यक्तीचा समावेश असलेल्या समितीचे गठन करण्यात येईल.

**इ)** बनावटी/ खोटे घोषणापत्र हे सर्वसाधारण “केंद्रीय वित्तीय नियम १४५” मधील कोड ऑफ इंटिग्रेटी नियम १७५ (१) (i) (h) चे उल्लंघन मानले जाईल. अशा प्रकरणी सदर निविदाकारास किंवा त्याच्या उत्तराधिकाऱ्यास “सर्वसाधारण वित्तीय नियमाच्या” नियम क्र.१५१ (iii) नुसार २ वर्षापर्यंत खरेदी प्रक्रियेत भाग घेण्यासाठी निलंबित करण्यात येईल. यासह त्याच्यावर कायद्यानुसारही योग्य ती कार्यवाही करण्यात येईल.

**फ)** सदर तरतूदींचे उल्लंघन केल्याच्या कारणास्तव एखाद्या पुरवठादारास कोणत्याही खरेदीदार विभागाने निलंबित केले असल्यास, पुरवठादारास इतर कोणत्याही विभागाच्या खरेदी प्रक्रियेमध्ये सदर निलंबन कालावधीत अपात्र असेल. सदर निलंबनाचे आदेश हे संबंधित खरेदीदार विभागाने निर्गमित केल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

४) **दिनांक ०१.१२.२०१६ रोजीच्या सुधारित खरेदी धोरणातील परिच्छेद क्र.५.१४ -**

संदर्भ क्र. ३ रोजीच्या शासन निर्णयान्वये कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दती धोरणामध्ये परिच्छेद ५.१४ मधील परिशिष्ट -१७ (प्रपत्र अ व ब) मध्ये सुक्ष्म व लघु उद्योग उपक्रमाकडून खरेदीसाठी राखीव ठेवलेल्या वस्तू कायम राहतील. तथापि, राखीव वस्तूची खरेदी १०० टक्के सुक्ष्म व लघु उद्योगांकडून करतांना त्यातील २० टक्के खरेदी ही अनुसूचित जाती किंवा अनुसूचित जमातीच्या उद्योजकांकडून करण्याचे जे प्रमाण आहे ते आता २५ टक्के करण्यात येत आहे.

जेव्हा सुक्ष्म व लघु उद्योग/उपक्रम निविदा प्रक्रियेत भाग घेतील आणि जर खरेदी करावयाची वस्तू/विषय राखीव ठेवला नसेल तर एल-१ किंमतीने एकूण आदेशाच्या २० टक्के मागणी ही सुक्ष्म व लघु उद्योगांकडून करावयाचे प्रमाण हे आता २५ टक्के एवढे करण्यात येत आहे. या २५ टक्के पैकी ५ टक्के खरेदी ही अनुसूचित जाती किंवा अनुसूचित जमातीच्या उद्योजकांकडून करण्यात यावी व या २५ टक्के पैकी ५ टक्के खरेदी ही १०० टक्के महिलांची मालकी असलेल्या महिला उद्योजकांकडून एल-१ दराने करण्यात यावी. महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळदेखील सदर निविदेत भाग घेऊ शकते.

५) **गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवरुन खरेदी करणे -**

१. दि. २४ ऑगस्ट, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलची कार्यपध्दती राज्य शासनाने स्वीकृत केली असून, दिनांक ०१.१२.२०१६ रोजीच्या सुधारित खरेदी धोरणातील परिच्छेद २.४ मधील नमुद सर्व लक्षांकित विभाग/ कार्यालयांना सदर पोर्टलवरुन खरेदी करणे बंधनकारक केलेले आहे. तथापि, बहुतांशी खरेदीदार विभागांकडून गव्हर्नमेंट ई- मार्केटप्लेस (GeM) पोर्टलवरुन सर्व खरेदी होत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आलेले आहे. त्यानुषंगाने खरेदीचे सुधारीत धोरण दि.०१.१२.२०१६ मधील परिच्छेद २.४ अन्वये सर्व लक्षांकित विभाग / कार्यालयांना गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) वरून खरेदी करण्याबाबत सुचित करण्यात येत आहे.

तसेच दि.२४.०८.२०१७ रोजीच्या शासन निर्णयातील मधील मुद्दा क्र.४ व ५ प्रमाणे खरेदीदार विभागास खरेदी करावयाच्या वस्तू व सेवा गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टल वर उपलब्ध

नसल्यास, खरेदीदार विभागास सदर वस्तू व सेवांची खरेदी करण्यासाठी संबंधित खरेदी अधिकाऱ्याला त्यांचे नियंत्रण अधिकारी / विभाग प्रमुख यांची पूर्व परवानगी घेणे आवश्यक राहिल.

६) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in येथे उपलब्ध असून, त्यांचा संगणक सांकेतांक २०२४०३१३११५४३०५०१० आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

LAXMIKANT GOPALRAO DHOKE

Digitally signed by LAXMIKANT GOPALRAO DHOKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=413beeca50b65438c7a037917ccf1f24d8ca684b65640df6372ea731ffac4dfc, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E714BBCD4D43C6782884C7E7A2091F9F1EDC1D97EBB542C48B98FB8C8BDD6CF4, cn=LAXMIKANT GOPALRAO DHOKE
Date: 2024.03.13 12:03:52 +05'30'

**( लक्ष्मीकांत ढोके )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत :-

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
४) महाराष्ट्र राज्यातील सर्व मा. संसद सदस्य
५) महाराष्ट्र राज्यातील सर्व मा. विधानसभा व विद्यापरिषद सदस्य
६) मा. मुख्य सचिव
७) सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
८) प्रबंधक, मूळ न्यायशाखा, उच्च न्यायालय, मुंबई/नागपूर/औरंगाबाद (पत्राने)
९) प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई/नागपूर/औरंगाबाद (पत्राने)
१०) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
११) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (२ प्रती)
१२) प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१३) महाराष्ट्र राज्यातील सर्व मुख्य माहिती आयुक्त यांचे उप सचिव
१४) विकास आयुक्त, (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई ४०० ०३२
१५) सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य
१६) पोलिस महासंचालक, मुंबई
१७) नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे १८) आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, ३ रा मजला, मध्यवर्ती शासकीय इमारत, पुणे ४११००१
१८) आयुक्त (पशुसंवर्धन), महाराष्ट्र राज्य, पुणे
१९) आयुक्त (मत्स्यव्यवसाय), तारापोरवाला मत्सालय, चर्नी रोड, मुंबई
२०) आयुक्त (दुग्धव्यवसाय), वरळी दुग्धशाळा, वरळी सी फेस, मुंबई
२१) शिक्षण केंद्र, शिक्षण केंद्र, (मध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
२२) संचालक, लेखा व कोषागारे, प्रशासकीय इमारत, मंत्रालयासमोर, मुंबई
२३) विक्रीकर आयुक्त, विक्रीकर भवन, माझगाव, मुंबई
२४) संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री संचालनालय, चर्नी रोड, मुंबई
२५) संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२६) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, शासकीय दंत महाविद्यालय, सीएसटी, मुंबई
२७) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
२८) साखर आयुक्त, साखर आयुक्तालय, पुणे
२९) पणन संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

३०) संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर
३१) आयुक्त, महिला व बालविकास पुणे
३२) अप्पर पोलिस महासंचालक व कारागृह महानिरिक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे
३३) मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख (संबंधित प्रशासकि विभागांच्या मार्फत)
३४) सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य
३५) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
३६) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई
३७) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई
३८) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर
३९) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -२, नागपूर
४०) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई ४०० ६१४
४१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
४२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
४३) सर्व आयुक्त, महानगरपालिका, महाराष्ट्र राज्य
४४) सर्व नगरपरिषदांचे मुख्य अधिकारी
४५) सदस्य सचिव, महाराष्ट्र पोल्युशन कंट्रोल बोर्ड, छत्रपती शिवाजी मार्केट बिल्डींग, ४ था मजला, पलटन रोड, मुंबई ४०० ००१
४६) महाव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, वाहतूक भवन, डॉ. आनंदराव नायर मार्ग, मुंबई ४०० ००८
४७) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वीज मंडळ, हॉगकॉग बिल्डींग, महात्मा गांधी मार्ग, मुंबई ४०००० १
४८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य औद्योगिक व गुंतवणूक महामंडळ (सिकॉम), निर्मल बिल्डिंग, १ ला मजला, नरीमन पॉईंट, मुंबई ४०० ०२१
४९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मंत्रमाग महामंडळ, मुंबई
५०) व्यवस्थापकीय संचालक, कोकण विकास महामंडळ, वॉर्डन हाऊस, ५ वा मजला, सर पी.एम. रोड, मुंबई ४०० ००१
५१) व्यवस्थापकीय संचालक, मराठवाडा विकास महामंडळ, विकास भवन, डॉ. राजेंद्रप्रसाद मार्ग, औरंगाबाद ४३१००१
५२) प्रशासकीय संचालक, महाराष्ट्र विकास महामंडळ, कुबेरा चेंबर्स, रेड रॉक्स हाऊस, संचेती हॉस्पिटलजवळ, डॉ. राजेंद्रप्रसाद रोड, पुणे ४११ ००५
५३) व्यवस्थापकीय संचालक, विदर्भ विकास महामंडळ, महाजन बिल्डींग, मेन रोड, सिताबर्डी, नागपूर-१२ ५६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वस्त्रोद्योग महामंडळ, लोटस हाऊस, ३३-ए, न्यू मरीन लाईन्स, मुंबई ४०० ०२०
५४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र इलेक्ट्रॉनिक महामंडळ, प्लॉट क्र. २१४, बैंकने रेक्लेमेशन, रहेजा सेंटर, १२ या मजला, नरीमन पॉईंट, मुंबई ४०००२५
५५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ, "कृपानिधी "९, वालाचंद हिराचंद मार्ग, बेलार्ड इस्टेट, मुंबई ४०० ०३८
५६) अध्यक्ष, महाराष्ट्र पेट्रोकेमिकल्स कॉर्पोरेशन, द्वारा: सिकॉम, निर्मल बिल्डींग, नरीमन पॉईंट, मुंबई ४०० ०२१
५७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडल, ६-ए, नवाज ले-आऊट, टिळक नगर, अमरावती रोड, नागपूर १०
५८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य शेती महामंडळ, ३७०, माखुर्जा, सेनापती बापट मार्ग, पुणे ४११ ०१६

५९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, प्लॉट क्र. बी, सर्व्हे क्रमांक ५८३, मार्केट यार्ड, गुलटेकडी, पुणे ४११००९

६०) व्यवस्थापकीय संचालक, मत्स्यव्यवसाय विकास महामंडळ, एम. के. एम. इंटरनेशनल हाऊस, १७८, बैंकचे रेक्लमेशन, बी. एम. चिनॉय मार्ग, मुंबई ४०००२०

६१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र तेलबिया, वाणिज्य आणि उद्योग महामंडळ, २०१, जॉली भवन क्रमांक २, २ रा मजला, न्यू मरीन लाईन्स, मुंबई ४०० ०२०

६२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र ॲग्रीकल्चर फर्टिलायझर प्रमोशन महामंडळ (मॅपको) मिश्री भवन, ६ या मजला, दिनशा बाच्छा मार्ग, मुंबई ४०० ०२० ६६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, मेंढी फार्म, गोखले नगर, पुणे ४११०१६

६३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वियाणे महामंडळ, प्लॉट क्रमांक ८, शास्त्रीनगर, पी. एन. नंबर १९, अमनखान प्लॉट, अकोला ४४४००१

६४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ, एम. एस.एच.सी. कॉम्प्लेक्स, सुत गिरणीमागे, उमर रोड, नागपूर ४४०००९

६५) व्यवस्थापकीय संचालक, महराष्ट्र वीजमार्ग महामंडळ, वाशानी चेंबर्स, १ ल मजला, न्यू मरीन लाईन्स, मुंबई ४०० ०२०

६६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र भूविकास महामंडळ, न्यू ॲडमिनिस्ट्रेटिव्ह बिल्डिंग, ॲग्रीकल्चर कॉलेज कंपाऊंड, शिवाजीनगर, पुणे ४११ ००५

६७) उपाध्यक्ष, महाराष्ट्र गृहनिर्माण प्रादेशिक विकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, कलानगर, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१

६८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र सिंचन विकास महामंडळ, न्यू ॲडमिनिस्ट्रेटिव्ह बिल्डिंग, ॲग्रीकल्चर कॉलेज कंपाऊंड, शिवाजीनगर, पुणे ४११ ००५

६९) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, महाकाली मार्ग, मरोल, अंधेरी (पूर्वी), मुंबई ४०००९३

७०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र शहर आणि उद्योग विकास महामंडळ (सिडको), २ रा मजला, निर्मल बिल्डींग, नरीमन पॉईंट, मुंबई ४०० ०२१

७१) महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (BMRDA), गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१

७२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य गृहनिर्माण महामंडळ, एन.सी.सी. नेहरू मेमोरियल हॉल, ४- ए.डॉ. आंबेडकर मार्ग, पुणे ४००००१

७३) महाव्यवस्थापक, महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ, जुहू सुप्रीम शॉपिंग सेंटर, गुलमोहर क्रॉसरोड नं. १, जे. व्ही. पी. डी. स्कीम (इतर) विलेपार्ले (प.) मुंबई ४०० ०४९

७४) व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, सी.डी.ओ. बॅरेंक क्रमांक ९, योगक्षेमजवळ,मादाम कामा रोड, मुंबई ४०० ०२०

७५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, बालरक्षक विद्यालय, १९/२१, मनोहरदास मार्ग, मुंबई ४०० ००१

७६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, आदिवासी विकास संकुल, न्यू ॲडमिनिस्ट्रेशन बिल्डींग, २ रा मजला, रमाबाई आंबेडकर गर्ल्स स्कूलजवळ, जुना आग्रा रोड,नाशिक -२

७७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य चर्मोद्योग विकास महामंडळ, बॉम्बे लाईफ बिल्डींग, ४५, वीर नरीमन मार्ग, ५ वा मजला, मुंबई ४०० ०२३

७८) व्यवस्थापकीय अधिकारी, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, एक्सप्रेस टॉवर, नरीमन पॉईंट, मुंबई ४०० ०२०

७९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ,

फिल्मसिटी, गोरेगाव (पूर्व), मुंबई ४०० ०६५

८०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ, अभ्यंकर नगर, नागपूर ४४० ०१०

८१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विदेश सेवा योजन व निर्यात प्रचालय महामंडळ (MOPBC) एक्स. के. बिल्डींग, २ रा मजला, नरोत्तम मोरारजी मार्ग, बॅलॉर्ड इस्टेट, मुंबई ४०० ०३८

८२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वित्तीय महामंडळ, १ वा मजला, न्यू एक्सेलसियर बिल्डिंग, अमृत केशव नायक मार्ग, मुंबई ४०० ००१

८३) व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ लिमिटेड, बॉम्बे मोरेवाडी, तालुका करवीर, जि. कोल्हापूर

८४) व्यवस्थापकीय संचालक, लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ, बिल्डींग क्रमांक ५, व्ही. आर. देसाई रोड, आझाद नगर क्रमांक २, अंधेरी (प) मुंबई ४०० ०५८

८५) व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ, जुहू सुप्रीमशॉपिंग सेंटर, गुलमोहर क्रॉस रोड, क्रमांक ९, जे.व्ही. पी. डी. स्कीम (उत्तर), विलेपार्ले (प.), मुंबई ४०० ०४९

८६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी संघ (महाटेक्स), १ ला मजला, वाशानी चेंबर्स, ४७, सर विठ्ठलदास ठाकरसी मार्ग, मुंबई

८७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कापूस उत्पादक खरेदी विक्री संघ, गौतम बिल्डींग, झकेरिया बंदर रोड, शिवडी, मुंबई ४०००१५

८८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य तेलबिया उत्पादक सहकारी संघ, २४, रामदार कॉलनी, शिलापेठ, जळगाव- ४२५००१

८९) सदस्य सचिव व संचालक, महाराष्ट्र उर्जा व विकास संस्था (MEDA) न्यू कामानी चेंबर्स, रामजीभाई कामानी मार्ग, बेलॉर्ड इस्टेट, मुंबई ४०० ०३८

९०) संचालक, हाफकिन इन्स्टिटयूट फॉर ट्रेनिंग रिसर्च ॲण्ड टेस्टींग, आचार्य दोंदे मार्ग, परेल, मुंबई ४०० ०१२

९१) वेलफेअर कमिशनर, महाराष्ट्र लेदर वेलफेअर बोर्ड, मुंबई गिरणी कामगार क्रीडा भवन, सेनापती बापट मार्ग, बॅलॉर्ड इस्टेट, मुंबई ४०० ०३०

९२) संचालक, माजी सैनिक प्रशिक्षण उत्पादन केंद्र, सातारा

९३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासने

९४) निवड नस्ती (उद्योग ४).